**परिविक्षाधीन सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था वर्ग - २ यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राजस-१२१२/प्र.क्र.२९१/१२-स**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ९ सप्टेंबर, २०१४

<u>वाचा :-</u>

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः राजस-१२०८/१३९(७)/ प्र.क्र.२८१/१२-स, दि.१३/४/२००९

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः राजस-१२१२/प्र.क्र.२९१/१२-स, दि.८/१/२०१४

३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्थापना/कक्ष-२/ अ-१/ परि.०९/ २०१३, दि.२५/११/२०१३.

४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्थापना/कक्ष-२/ अ-१/ परि.०९/ २०१३, दि.७/५/२०१३

५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा. क्र.आस्थापना/कक्ष-२/ अ-१/ परि.०९/ २०१४, दि. १६/५/२०१४.

<u>प्रस्तावना :-</u>

उपरोक्त वाचा येथे नमूद शासन निर्णय दि.१३/४/२००९ अन्वये एकूण ५४ उमेदवारांची परिविक्षाधीन सहायक निबंधक म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. या अधिकाऱ्यांपैकी श्री.जी.जी.माचेवाड हे अधिकारी वगळता उर्वरित ५३ अधिकारी कर्तव्यावर रुजू झालेले होते. तथापि, दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी व पूर्ण झाल्यानंतर ११ अधिकारी खाते सोडून गेले आहेत. उर्वरित ४२ उमेदवारांपैकी २८ उमदेवारांचे परिपूर्ण प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्याने उपरोक्त वाचा येथील नमूद शासन निर्णय दिनांक ८/१/२०१४ अन्वये निर्गमित करण्यात आला. आता उर्वरित उमेदवारांपैकी ५ उमेदवारांचे परिपूर्ण प्रस्ताव शासनास प्राप्त झालेले असल्याने सदर उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब या संवर्गातील सरळसेवेने नियुक्ती करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस करण्यात आलेल्या एकूण ५४ उमेदवारांना उपरोक्त दि.१३.०४.२००९ च्या शासन निर्णयान्वये २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती देण्यात आलेली आहे. सदर उमेदवारापैकी २८ उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबतचा शासन निर्णय दि. ८/१/२०१४ रोजी निर्गमित करण्यात आलेला आहे. उर्वरित उमेदवारांपैकी ५ उमेदवारांची परिपूर्ण माहिती सहकार आयुक्त कार्यालयाकडून प्राप्त झाली आहे. उपरोक्त नियुक्ती आदेशातील अटीनुसार २ वर्षाचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या खालील उमेदवारांचा परिविक्षा कालावधी त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून समाप्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सदर दिनांकापासून प्रस्तूत आधिकाऱ्यांना त्यांच्या पदावर नियमित नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पद | परिविक्षा कालावधी सुरु दिनांक | परिविक्षा कालावधी समाप्त दिनांक | रजा कालावधी (असल्यास) एकूण दिवस | नियमित नियुक्ती दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. मनोज मधुकर चौधरी सहायक निबंधक सहकारी संस्था, नंदुरबार, जि. नंदुरबार. | ०८/०५/२००९ | १०/१०/२०११ | १५६ | ११/१०/२०११ |
| २ | श्री. दिलीप रंगनाथ तिजोरे , सहायक निबंधक सहकारी संस्था, नेवासा , जि. अहमदनगर | ०६/०५/२००९ | २०/०९/२०११ | ६६ | २१/०९/२०११ |
| ३ | श्रीमती प्रिती विष्णू क्षीरसागर , सहायक निबंधक, सहकारी संस्था, (दुग्ध) सातारा. | १३/०५/२००९ | १६/०१/२०१३ | ४२ | १७/०१/२०१३ |
| ४ | श्री. योगेश रंजीतराव देसाई, सहायक निबंधक सहकारी संस्था, महाबळेश्वर, जि. सातारा. | २९/०४/२००९ | १६/०१/२०१३ | १०९ | १७/०१/२०१३ |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पद | परिविक्षा कालावधी सुरु दिनांक | परिविक्षा कालावधी समाप्त दिनांक | रजा कालावधी (असल्यास) एकूण दिवस | नियमित नियुक्ती दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| ५ | श्रीमती अर्चना सदाशिव माळवे, सहायक निबंधक सहकारी संस्था, यवतमाळ, जि. यवतमाळ. | ३०/०४/२००९ | १६/०१/२०१३ | निरंक | १७/०१/२०१३ |

२. महाराष्ट्र लोकसेवा आयेगाने घेतलेल्या विभागीय परिक्षेत उपरोक्त तक्त्यातील अनुक्रमांक १ ते २ येथील अधिकारी हे दि.२०/९/२०११ रोजी उत्तीर्ण झाले असून अनुक्रमांक ३ ते ५ येथील अधिकारी दि.१६/१/२०१३ रोजी उत्तीर्ण झाले आहेत. त्यामुळे त्यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करतांना उमेदवार ज्या दिनांकाला विभागीय परिक्षा उत्तीर्ण झालेले आहेत तो दिनांक विचारात घेण्यात आला आहे.

३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सर्व संबंधितांना कळवून उपरोक्त अधिकाऱ्यांच्या सेवा पुस्तकात योग्य ती नोंद घेण्याची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१३०४१८१६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2014.09.09 12:59:14 +05'30'

( सु.मु.धाडवे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

५. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (प्रशासन), पुणे, औरंगाबाद, मुंबई, कोकण नवी मुंबई, लातूर,अमरावती, नाशिक, कोल्हापूर.

६. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, अहमदनगर, सातारा, यवतमाळ, नंदुरबार.

७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, मुंबईनागपूर/ (लेखापरीक्षा व अनुज्ञेयता)

८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, सातारा, यवतमाळ, नंदुरबार.

९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१०. विशेष कार्य अधिकारी, लेखापरिक्षण मंडळ (पदुम), मुंबई.

११. मा. मंत्री (सहकार)/मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव

१२. सर्व संबंधित अधिकारी द्वारा- सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे

१३. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१४. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१५ अ.मु.स.(पणन)/प्रधान सचिव (वस्त्रोद्योग)/सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक.

१६ कक्ष अधिकारी ५-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

१७ निवड नस्ती.